चित्र-चरित्र
शब्द-चरित्र

# लॉरी बेकर

श्वेता साळुंखे, नागेश मोने

**प्रकाशन : 29 डिसेंबर 2018**
भारतीय सौर 8 पौष शके 1940



**प्रकाशक**
न्यू इंग्लिश स्कूल, टिळक रोड, पुणे

**पुस्तकाची मूळ संकल्पना**
गिरीश दोशी, अंकुर कोठारी व राहूल रावत

**भाषिक संपादन आणि मुद्रितशोधन**
विकास पढेर
+91 8888366996

**मुखपृष्ठ आणि आतील चित्रे**
श्वेता साळुंखे
+91 8793388968

**मुखपृष्ठ रचना/अक्षरे/अंतर्गत मांडणी**
शरद प्रभुदेसाई

**अक्षरजुळणी आणि मुद्रक**
व्ही. बी. प्रिंटर्स, पुणे

**संदर्भ साह्य**
अतुल देऊळगांवकर यांचे पुस्तक.
अरविंद गुप्ता यांचा लेख.
माहितीचे महाजाल.

**खाजगी वितरणासाठी**

# लॉरी बेकर





डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे
न्यू इंग्लिश स्कूल, टिळक रोड, पुणे ३०.



'अहम भारत' उपक्रमांतर्गत पुस्तिका®

Cadence Design Systems, Inc.
cadence®

# लॉरी बेकर

## चित्र चरित्र

"श्रीमंत, मध्यमवर्गीय, गरीब, आदिवासी, कोळी अशा वेगवेगळ्या वर्गांतील लोकांसाठी घरे मी कधीच बांधत नाही. मी मॅथ्यू, भास्कर, मुनीर, शंकर या व्यक्तींसाठी घरे जरूर बांधीन."

– लॉरी बेकर

# लॉरी बेकर






वास्तुनिर्मितीचं कितीतरी श्रेष्ठ काम या भारत देशात झालंय. भारताची स्वतःची अशी वास्तुनिर्मितीची उत्कृष्ट दर्जाची शैली आहे. जगातल्या कुठल्याही देशात, असं विविधतेचं काही नाहीये. आपण ते नष्ट करू नये, असं मला वाटतं. ते जपावं, वाढवावं त्याचा वापर अधिकाधिक करून उत्तम व सुंदर इमारतींच्या रचनांची भारतीय परंपरा पुढं न्यावी.

Laurie Baker

## लॉरी बेकर

2 मार्च 1917 रोजी लॉरेन्स विल्फ्रेड बेकर यांचा जन्म इंग्लंडमध्ये झाला. आपण त्यांना 'लॉरी बेकर' या नावाने ओळखतो.

लॉरेन्स विल्फ्रेड बेकर किंवा आपल्याला माहीत असणारे 'लॉरी बेकर', हे एका कट्टर, परंपरा पाळणाऱ्या कुटुंबात लहानाचे मोठे झाले.

बेकर यांना वास्तुविद्या आणि बांधकाम या विषयांची अगदी लहान वयापासून आवड होती. अवघ्या सतरा वर्षांचे असताना लॉरी, युरोपच्या सायकल सफरीस गेले. या सफरीत त्यांनी अनेक शहरे आणि भूदृश्ये पाहिली. त्यांना ती अत्यंत आवडली. वेगवेगळ्या देशांतील तऱ्हेतऱ्हेचे राहणीमान आणि घरांमधील विविधता, ह्यांचा त्यांच्या मनावर कायमचा ठसा उमटला. सफरीवरून घरी परततानाच त्याने आपला भविष्यकाळातील व्यवसाय म्हणून 'वास्तुविद्या' म्हणजेच 'आर्किटेक्चर' हे क्षेत्र निवडायचे मनात पक्के केले.



## शिक्षण

मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर लॉरी बेकर यांनी बर्मिंगहॅम स्कूल ऑफ आर्किटेक्चर, लंडन येथून पुढील शिक्षण घेऊन 1938 साली रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ आर्किटेक्ट्सचे सदस्यत्व मिळविले. दुर्दैवाने, वास्तुविशारद म्हणून इंग्लंडमध्ये काम करण्याची विशेष संधी त्यांना मिळाली नाही. याच वर्षी नेमकी 1939 मध्ये दुसऱ्या महायुद्धाला सुरुवात झाली होती.

## ''फ्रेंड्स (मित्र)'' रुग्णवाहिका

दुसऱ्या महायुद्धाच्या दरम्यान बेकर आणि त्यांच्या मित्रांनी फ्रेंड्स रुग्णवाहिका सेवेमध्ये (Friends Ambulance Unit - FAU) स्वत:चे नाव नोंदविले. भूल देणे, शस्त्रक्रियेशी संबंधित शुश्रूषा करणे, सुईणीची कामे करणे, अशा कामांचे प्रशिक्षण घेऊन त्यांनी युद्धक्षेत्रामध्ये लोकांना मदत केली.






## चीन-जपान युद्ध

पुढच्या काळात चीन आणि जपान यांच्यामधील युद्धादरम्यान चिनी सरकारने फ्रेंड्स रुग्णवाहिका सेवेला, मदत पाठविण्याचे आवाहन केले. युद्धामध्ये जखमी झालेल्या व्यक्तींच्या शस्त्रक्रिया झाल्यानंतर अशा व्यक्तींची शुश्रूषा करणाऱ्या गटामध्ये लॉरी बेकर यांचाही सहभाग होता.






## महात्मा गांधींचा प्रभाव

लॉरी बेकर यांनी नंतरच्या काळात म्यानमारमध्ये, वेगवेगळ्या युद्धांत जखमी झालेल्यांची आणि कुष्ठरोग्यांची शुश्रूषा केली. तब्येतीकडे केलेल्या दुर्लक्षामुळे व अधिक श्रमाने त्यांची तब्येत खालावली आणि त्यांना इंग्लंड येथे परतावे लागले.

या परतीच्या प्रवासात बेकर यांना, मुंबई येथे तीन महिने बोटीची वाट पाहात मुक्काम करावा लागला. त्या काळात महात्मा गांधींना भेटण्याचा त्यांना योग आला. गांधीजींच्या अहिंसा आणि प्रेमाच्या शिकवणीकडे, लॉरी बेकर यांचे मन लगेच वळले; व या शिकवणीचे बीज त्यांच्या मनात खोलवर रूजले.

गांधीजींनी लॉरी बेकर यांना भारतात परत येण्याचे साकडे घातले. भारताच्या खेडोपाड्यांत घरांची नितांत आवश्यकता आहे, तसेच ही घरे, खरे तर स्थानिक पाच मैल अंतरापर्यंत मिळणाऱ्या बांधकाम साहित्यातून घडवणे गरजेचे असल्याचे, गांधीजींनी त्यांना सांगितले.

## सहजीवनाला सुरुवात

लॉरी बेकर 1945 साली कुष्ठरोग्यांच्या सेवेसाठी भारतात परतले. ते या काळात त्यांच्या डॉ. चॅन्डी या मित्रासोबत राहत असताना, त्यांचा परिचय डॉक्टरांची बहीण एलिझाबेथ जेकब यांच्याबरोबर झाला. त्यासुद्धा पेशाने डॉक्टरच होत्या.

लॉरी बेकर यांनी, एलिझाबेथ यांच्याबरोबर जुन्या दवाखान्यांचे मोठ्या इस्पितळांमध्ये रूपांतर करण्याचे काम केले. एलिझाबेथ ह्या कुष्ठरोग्यांवर औषधोपचार करीत असत. दोघेही आपल्या ध्येयाशी एकजीव झाले होते.

एकदा असेच एका मोठ्या खडकावर बसले असताना, लॉरी बेकर यांनी एलिझाबेथ यांना लग्नासाठी विचारले. एलिझाबेथ यांनाही लॉरी बेकर यांना भेटल्यावर त्या दोघांचा दीर्घ सहवास असणार आहे, याची खात्री पटली होतीच. त्याही ताबडतोब 'हो' म्हणाल्या आणि 1948 साली दोघांचा विवाह झाला.



## हिमालयातील काळ

विवाहानंतर लॉरी बेकर आणि एलिझाबेथ हिमालयात 'चंदांग' येथे गेले व पुढील सोळा वर्षे तेथेच राहिले. नवा डॉक्टर आल्याचे कळल्यावर, त्यांच्याकडे औषधोपचारासाठी लोक दुरून दुरून येत असत. दोघांनी एका, वापरात नसलेल्या चहाच्या लहानशा दुकानात, इस्पितळ सुरू केले. काही काळानंतर त्यांनी चेरा नावाच्या लहानशा गावातल्या एका घरातही, आणखी एक इस्पितळ सुरू केले.

त्यांना कधी कुणी विचारले की, 'तुम्ही आर्किटेक्ट असून दवाखान्यात काम कसे काय करता'?, तर ते हसून म्हणायचे, 'बाई डॉक्टर आहेत आणि मी त्यांच्या हाताखाली काम करणारा त्यांचा सेवक !

उत्तर प्रदेशातील फैजाबाद आणि त्या परिसरातील कुष्ठरोग्यांच्या वसाहतींच्या देखभालीचं काम पण त्यांनी केलं.





## स्थानिक बांधकाम

हिमालय, केरळ आणि भारतात इतर अनेक ठिकाणी कामांसाठी फिरल्यावर लॉरी बेकर यांच्या लक्षात आलं की, त्यांनी इंग्लंडमध्ये घेतलेले शिक्षण, भारतातील विविध हवामान क्षेत्रांत व भूप्रदेशांत विशेष उपयोगाचे नाही.

स्थानिक बांधकाम साहित्याचं संकलन करणं, त्याची वर्गवारी करणं, त्याची निवड करणं, या साहित्यातून हस्तकलेच्या वस्तू बनविणं, हे सर्व लॉरी बेकर स्थानिक लोकांकडून शिकले. तसेच स्थानिक लोकांसारखे ते साध्या पद्धतीने राहू लागले.

त्यांनी बांधलेल्या अनेक शाळा, इस्पितळे व सामाजिक इमारती, हे सर्व ते स्वखर्चाने चालवीत असत. बेकर ह्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण बांधकाम पद्धतीची हीच सुरुवात होती.




## केरळ

1963 साली लॉरी बेकर दाम्पत्य हिमालयातून मध्य केरळमधील 'वागमन' या छोट्याशा आदिवासी डोंगराळ भागात स्थायिक झाले. त्यांनी तेथे अनेक शाळा उभ्या केल्या व कुष्ठरोग्यांसाठी औषधालये उभी केली.

काही वर्षांनंतर ते तिरुअनंतपूरम येथे फिरायला गेले असताना, त्यांनी तेथेही कुष्ठरोग्यांसाठी सेवाकार्य सुरू केले आणि बेकर दाम्पत्य या दक्षिणेकडील शहरात स्थायिक झाले.

## द हॅम्लेट (वाडी)

बेकर दाम्पत्य तिरुअनंतपूरम येथे स्थायिक झाल्यानंतर, त्यांनी स्वतःचे घर बांधण्यासाठी अर्धा एकर जमीन विकत घेतली.

एका लहानशा डोंगरावरून समोरच्या दरीकडे बघणारे 'द हॅम्लेट' हे त्यांचे घर म्हणजे वास्तुकलेचा वारसा सांगणारे एक संग्रहालयच होय.

या वास्तूची उतरती कौलारू छपरे, वास्तूची रचना, भिंतींचा पोत, दारं व खिडक्या, सर्वच्या सर्व, केरळच्या बांधकाम पद्धतीत आणि बांधकाम साहित्यात, त्याआधी अनेक वर्षांत झालेले आमूलाग्र बदल दाखवितात.



## बेकर यांचे काम

बेकर यांनी चाळीस वर्षांच्या कारकिर्दीत अनेक इमारती उभ्या केल्या. सुरुवातीच्या काळातल्या त्यांच्या पिठोरगढ येथील कामाची नोंद कुठेच नीट मिळत नाही. तिरुअनंतपूरम येथे 1963 मध्ये मुक्काम हलविल्यानंतर खऱ्या अर्थाने, रूढीप्रमाणे त्यांचा वास्तुविशारदाचा व्यवसाय सुरू झाला.

खाजगी घरे, चर्च इमारती अशा हजारांहून जास्त प्रकल्पांवर तिरुअनंतपूरममध्येच त्यांनी काम केले. रास्त किंमत व स्थानिक बांधकाम शैलीचा वापर, हे दोन पैलू त्यांच्या सर्व प्रकल्पांमध्ये प्रकर्षाने जाणवतात.



## लॉरी बेकरचं म्हणणं...

- "माझ्या निरीक्षणाप्रमाणे स्थानिक वास्तुविशारदाकडे किंवा आर्किटेक्टकडे सगळ्याच प्रश्नांची उत्तरे असतात. प्रत्येक जिल्ह्यात तुम्ही जेथे जाल, तेथे पूर्वी स्थानिक लोक स्वत:च मोठ्या कष्टाने स्वत:साठी घरं बांधीत. आता मात्र त्यांनी स्वत: घरं बांधण्याचे कौशल्य गमावले आहे. काही कारणांमुळे लोकांना बाहेरच्या व्यक्तींची मदत आता घ्यावी लागत आहे."

- "भारतातील बांधकाम या विषयात सारासार विचार ज्यांनी कायम केला आहे, असे गांधींजी हे भारतात एकमेव नेते आहेत. माझ्या मनात जर कुठली गोष्ट खोलवर रुजली असेल, तर ती म्हणजे गांधींजींनी सांगितल्याप्रमाणे एखाद्या आदर्श गावातील आदर्श घर, हे स्थानिक पाच मैल अंतरापर्यंत मिळणाऱ्या बांधकाम साहित्यातून घडवलेलं असावे."

- "भारतासारख्या देशात आपल्या कोणालाच वस्तू, पैसा किंवा ऊर्जा ही दवडण्याची किंवा वाया घालवण्याची मुभा नाही, यात काहीच शंका नाही."

- "इतर वास्तुविशारदांच्या कामापेक्षा माझ्यावर सर्वसामान्य कारागिरांनी केलेल्या कामाचा जास्त प्रभाव आहे."

- "अल्प किमतीतील घरं फक्त गरिबांसाठीच, असं कुणी मानू नये. अल्प किंमत म्हणजे बेताचा दर्जा आणि कमी सुविधा नाहीत. दारिद्र्याचं पूजक कुणीच व्हायचं नाही."

# लॉरी बेकर



## कालानुक्रमे पुरस्कार

लॉरी बेकर यांनी वास्तुकला क्षेत्रात अत्युच्च दर्जाचे योगदान दिले आहे. वैयक्तिक आयुष्य उत्तम पद्धतीने सांभाळून तितक्याच उत्तम दर्जाचे व्यावसायिक काम त्यांच्याकडून घडले. याचे महत्त्वाचे कारण म्हणजे दोन्हीकडे साधलेली एकाग्रता होय. आपल्या ध्येयाशी, आपल्या जीवनकार्याशी एकरूप होण्याची, तादात्म्य पावण्याची, त्यांची वृत्ती माणसांना आजही प्रेरणा देत आहे.

बेकर यांनी आपल्या कामातून सर्वांसाठीच आदर्श उभा केला आहे. त्यांचे काम आपल्या सर्वांनाच प्रेरणा देत राहील.

1917 : जन्म

1938 : असोसिएट ऑफ रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ आर्किटेक्टस्

1981 : 'रॉयल युनिव्हर्सिटी ऑफ नेदरलँड्स' कडून तिसऱ्या जगातल्या देशात उल्लेखनीय काम केल्याबद्दल डी.लिट ही पदवी.

1987 : राष्ट्रीय निवासस्थान पहिला पुरस्कार

1988 : भारतीय नागरिकत्व प्रदान

1990 : पद्मश्री प्रदान

1992 : युनायटेड नेशन हॅबीटॅट पुरस्कार आणि हॅबीटॅट रोल ऑफ ऑनर

1993 : इंटरनॅशनल युनियन ऑफ आर्किटेक्ट्स पुरस्कार

1993 : मानवी वसाहती सुधारणाबाबत सर रॉबर्ट मॅथ्यू पारितोषिक

1994 : पीपल ऑफ दि इयर पुरस्कार

1995 : युनिव्हर्सिटी ऑफ लंडनकडून डॉक्टरेट प्रदान

1998 : श्री वेंकटेश्वर युनिव्हर्सिटीकडून डॉक्टरेट

2006 : प्रिट्झकर पुरस्कारासाठी नामनिर्देशन

2007 : निधन

# लॉरी बेकर

## शब्द चरित्र

विटा मला नेहमी माणसांच्या चेहऱ्यांसारख्या वाटतात. तीच माती, चिखल यांना भाजूनच त्या विटा तयार केलेल्या आहेत. पण प्रत्येक विटेचा आकार दुसऱ्या विटेपेक्षा निराळा, त्यांचा घाटही निराळा आणि रंगातही थोडा फार फरक. प्रत्येक विटेचा पोतही निरनिराळा म्हणून स्पर्शही वेगळा.

म्हणून, विटांनी तयार केलेल्या भिंतींना प्लास्टर लावू नये, असे मला वाटते. असे प्लास्टर कृत्रिम आणि अनावश्यकही आहे. विटांचं असलेलं निरनिराळं व्यक्तिमत्त्व त्यामुळे नष्ट होते आणि परिणामी घराचंही, नाही का ?

– लॉरी



# लॉरी बेकर - शब्द चरित्र

लॉरी बेकर हे आपल्या देशातील महत्त्वाचे आर्किटेक्ट. वास्तुरचनेबाबत सतत चिंतन आणि कृती त्यांनी आयुष्यभर केली. शासकीय अथवा निमशासकीय कार्यालयं, घरं, इमारती यांच्या रचना करणारे लॉरी बेकर, हे सर्व लोकांना परवडतील अशी घरं बांधायचे. ऊर्जेचा कमीत कमी वापर, आपल्या वातावरणाशी, पर्यावरणाशी मिळतीजुळती सुंदर घरं लोकांच्या गरजेनुसार बांधून देणारे विशेष आर्किटेक्ट म्हणजे लॉरी बेकर !

इंग्लंडमधील बर्मिंगहॅमधील त्यांचा जन्म 1917 सालचा. 2007 साली भारतात त्यांचे निधन झाले. म्हणजे नव्वद वर्षांचे आयुष्य त्यांना लाभले. घरांची रचना करण्याचे त्यांचे कार्य, त्यांनी वयाच्या पन्नासाव्या वर्षी सुरू केले होते! बर्मिगहॅममधील महाविद्यालयात त्यांनी शिक्षण घेतले. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात त्यांनी रूग्णसेवेचे काम चीनमध्ये केले. चीनवरून परत इंग्लंडला जाताना, त्यांचा मुंबई येथे मुक्काम झाला आणि महात्मा गांधींशी त्यांची गाठभेट झाली. महात्मा गांधींचे लक्ष लॉरी बेकर यांच्या बुटांकडे गेले. हे बूट लॉरी बेकर यांनी स्वतः बनविले होते. कौशल्य, सौंदर्यदृष्टी आणि साध्या कामातही बारकाईने लक्ष घालण्याची बेकर यांची कृती, यांमुळे महात्मा गांधी प्रभावित झाले आणि अशा व्यक्तींचीच आमच्या देशाला गरज असल्याचे, त्यांनी बेकर यांना सांगितलं. घरं बांधताना आपण स्थानिक लोकांचा आणि स्थानिक साहित्याचा विचार करावयास हवा, असं गांधींजींनी त्यांना सुचवलं. अशा वेळी स्थानिक गरजही लक्षात घेणं गरजेच असतं, असंही ते म्हणाले. पाच मैलांच्या परिसरातील साहित्याचाच अधिकाधिक वापर आपण करायला हवा, असंही गांधीजी त्यांना म्हणाले.

काही वर्षांनी बेकर भारतात परत आले आणि कुष्ठरोग्यांसाठी त्यांनी घरं, इमारती बांधण्याचे काम केले. इ.स. 1948 मध्ये एलिझाबेथ जेकब यांच्याबरोबर त्यांचा विवाह झाला आणि त्यांनी कुष्ठरोग्यांच्या इस्पितळात कामाला सुरुवात केली. एलिझाबेथ या डॉक्टर आणि स्वतः बेकर त्यांचे साहाय्यक! वेल्थि फिशर या प्रख्यात शिक्षणतज्ज्ञ महिलेसाठी त्यांनी 'अक्षर सदन' (Literacy House) ची रचना केली आणि लखनौमध्येच मनोरुग्णांसाठी 'नूर मंजिल' या घराची रचना केली.



बर्मिंगहॅम स्कूल ऑफ आर्किटेक्चर

वयाच्या एका टप्प्यात बेकर 'क्वेकर' पंथाकडे ओढले गेले. धार्मिक रुढींबाबत प्रश्न उपस्थित करणे, विवेकानं विचार करणे ही या पंथाची लक्षणं! या पंथात काम करणाऱ्या संस्थेला 1947 मध्ये शांततेसंदर्भातील कामाचं नोबेल पारितोषिक मिळालं आहे.

पैशाचं महत्त्व आणि त्याची योग्य उपयुक्तता लॉरीला लवकरच लक्षात आली. लहानपणी तो एका बेकरीत बिस्किटं आणायला गेला. संपूर्ण बिस्किटांपेक्षा, बिस्किटांचा चुरा त्याच पैशात दुप्पट मिळतो, हे त्यांच्या लक्षात आलं. आणि दोघांची चवही सारखीच आहे; तर कशाकरता पैशाची उधळपट्टी करा, असा त्यानं विचार केला. हा विचार त्यांना आयुष्यभर पुरला.



1960 या दशकाच्या अखेरीस ते त्रिवेंद्रम इथं आले आणि वयाच्या पन्नासाव्या वर्षी त्यांनी वास्तुरचना, बांधकाम करणं चालू केलं. पारंपरिक भारतीय कारागीर ज्या पद्धतीने काम करतात, ती पद्धत बेकर यांना योग्य आणि अर्थपूर्ण वाटली. पाठकोऱ्या कागदांचा वापर करून ते चित्रं काढत, डिझाईन रचत. स्वतःच अधिक काम करण्याकडे त्यांचा कल होता. त्यांनी स्वतःचं ऑफिस थाटलं नाही, की हाताखाली कुणी कामगार ठेवला नाही. अनेकांचं साह्य घेत, त्यांच्याशी बोलून, त्याची मदत घेत, त्यांना प्रशिक्षित करीत, लॉरी बेकर काम करीत असत. इतरांवर आणि व्यवस्थेवर होणारा अनावश्यक खर्च त्यामुळं टळे ! पर्यावरणाचा विचार प्राधान्यानं करणारे लॉरी बेकर, हे स्टील, सिमेंट वगैरे बाबी वापरणे शक्यतो टाळीत. आधी 'आपण' आहोत, असं ते म्हणत. 'कित्येक शतके आपण घरं बांधीत आलो आहोत. त्या मानाने सिमेंट हे अलीकडचे आहे,' असं ते म्हणत !



बेकर, त्यांच्या बांधकामाच्या साईटस् पाहण्यासाठी वरचेवर जात. एक दिवस ते एका गवंड्याला खूप रागावले; पण घरी गेल्यावर त्यांना वाटले, आपण उगाचच इतके रागावलो. त्यांनी एक क्षमापत्र लिहिलं आणि त्याच्याकडं धाडलं. सुतारांना, गवंड्यांना समजतील अशी घरबांधणीची ड्रॉईंग्ज ते काढायचे. टप्प्याटप्प्यात कसं बांधलं जातयं, हे

रविवारी आमचे पालक आम्हाला खेळू देत नसत. माझ्यापेक्षा माझा थोरला भाऊ दहा वर्षांनी मोठा होता. त्याला या नियमाचा फार राग यायचा. बंडखोरच होता तो ! तो पोहायला गुपचूप जायचा, टेनिस खेळायचा अन् काही वेळेस बुद्धिबळ देखील ! मला त्याच्याबद्दल खूप ओढ वाटायची. तो हिरोच माझा! जी गोष्ट उत्तम व योग्य आहे ती करायचीच आणि जी मूर्खपणाची, अर्थशून्य आहे ती टाळायची, असं त्याचं मत असायचं. यासाठी लागणारे धाडस मी त्याच्याकडून शिकलो !

– लॉरी

त्यांना समजावं अशी रेखाचित्रं असायची. थोडे कोरे असणारे कागद, लग्नपत्रिकांच्या कोऱ्या बाजू यांचा वापर ते त्यासाठी करायचे. केरळमध्ये इतकी वर्षे राहूनही त्यांना मल्याळम् भाषा नीट वापरता यायची नाही. पाणी, उद्या, बांधकाम साहित्य, एक, दोन असे मोजकेच मल्याळम् शब्द त्यांना यायचे. हिंदी बऱ्यापैकी यायचं त्यांना. भारतीय नागरिकत्वासाठी त्यांचा अर्ज शासनाकडे दीर्घकाळ पडून होता. 1988 मध्ये ते भारताचे अधिकृत नागरिक झाले. तसं होईपर्यंत दर तीन महिन्यातून एकदा त्यांना पोलीस स्टेशनमध्ये जावं लागे आणि तिथल्या रजिस्टरमध्ये नोंद करावी लागे.

भारतातील हिमालयाच्या भागात वर्षानुवर्षे टिकलेली, कमी खर्चात बांधलेली, बांधताना व बांधून झाल्यावरही ऊर्जेचा आवश्यक तेवढाच वापर करणारी घरे पाहून, बेकर यांना प्रेरणा मिळाली. स्थानिक साहित्याचा वापर करणारी ही घरे पाहून त्यांना गांधीजींच्या '5 मैलांच्या परिसरातील साधनांनी घरं बांधावीत' या विधानाची आठवण झाली. दरवेळी हे त्यांना शक्य होत असे असं नाही, तरी देखील बेकर तसा प्रयत्न करायचे. स्टील,काचा, सिमेंट हे पदार्थ निर्माण करताना प्रचंड ऊर्जा खर्च होत असल्याने, अशा पदार्थांचा कमीतकमी वापर करण्याकडे त्यांचा कटाक्ष असे. भिंतींमध्ये, फुटलेल्या रंगीत बाटल्यांच्या काचांचे तुकडे वापरून प्रकाशाचा खेळ उत्पन्न करणाऱ्या रचना ते काहीवेळा करायचे. असं केल्यास पंचवीस टक्के विटा कमी लागतात आणि घरांत आवश्यक आणि योग्य तितकी ऊब उत्पन्न होते, असं त्यांनी प्रयोग करून दाखविलं. सिमेंटऐवजी चुन्याचा वापर, उष्णता व हवा यांच्या नियमनासाठी जाळीदार भिंतींची रचना, स्टीलऐवजी बांबूचा वापर, गवत आणि चिखलाच्या मिश्रणातून भिंतींची रचना, अशा प्रयोगांतून बेकर आपली वास्तुरचना प्रगत करीत राहिले. याच वस्तूंचा वापर पुन्हा पुन्हा करून पर्यावरणाची हानीही टाळता येते, असं त्यांना वाटायचं.

भारतातील ग्रामीण भागात साध्या माणसांनी, कोणतीही मोठी यंत्रसामग्री हत्यारे उपलब्ध नसताना नुसत्या दगड, माती आणि लाकडाच्या वापराने बांधलेली सुंदर घरे पाहून, बेकर यांना आश्चर्यच वाटे. ते कागदावर अशा सर्व बाबींची

ज्याचं घर मी बांधतो, त्या व्यक्तींची माहिती मला हवी असते. त्यांच्या घरात काय शिजवतात? त्यांचा आहार काय? एकत्र जेवतात का? निजावयाची त्यांची खोली कशी असते? घरकाम, शिवणकाम, वाचन अशांसाठी काय सोय करायला हवी ? असा विचार मी सतत करीत असतो.

– लॉरी




शाळेत असताना लॉरी हा खूप हुशार विद्यार्थी नव्हता. पण चित्रं काढण्यात, रेखाचित्रं काढण्यात त्याला रस होता. दहावीच्या परीक्षेनंतर आर्किटेक्चर महाविद्यालयात प्रवेश घ्यायला त्याच्या मित्रांनी त्याला सुचवलं. शाळेचे मुख्याध्यापक बेकरच्या चित्रशैलीने, त्याच्या अभिरुचीने व रेखाचित्रांनी प्रभावित झाले. त्यांनी त्याला महाविद्यालयात प्रवेश दिला. तिथं बेकरने अचूकपणे रेखाटणे केली आणि तिथल्या दगडकामात, भांडी बनविण्याच्या कामात, सिरॅमिकच्या कामात व संगीत विषयात रसही घेतला. त्याच्या जगण्याचा पायाच जणू काही तिथं तयार झाला.

बेकर यांना एकदा दिल्लीच्या एका परिषदेसाठी बोलावले होते. विषय होता, गरीब लोकांसाठी घरे ! ही परिषद एका पंचतारांकित हॉटेलमध्ये होती. बेकर यांनी आयोजकांना नम्रपणे नकार कळविला. परिषदेसाठी लोकांच्या जाण्यायेण्याच्या आणि तिथल्या राहण्याच्या खर्चात एका गरीब माणसाचं घर बांधता येईल, असं त्यांनी कळवलं. तिथं जाण्यापेक्षा, घर बांधणीचा खर्च कमी करता येईल या विषयावर एक पुस्तिका त्यांनी लिहिली, आणि ती संयोजकांना पाठविली. ती पुस्तिका पुढं 'कॉस्टफोर्ड' या संस्थेनं प्रकाशितही केली.




नोंद करुन घ्यायचे आणि या घरांच्या बारीकसारीक बाबींचा गांभीर्याने विचारही करायचे. काळाच्या कसोटीवर उतरलेली ही साधी परंतु सुंदर घरे, त्यांना वास्तुकलेची नवी दृष्टी द्यावयास कारणीभूत ठरली.

पारंपरिक साहित्याबरोबरच स्थानिक लोकांचे उपलब्ध कौशल्य, ज्या व्यक्ती ही वास्तू वापरणार त्याच्या गरजा आणि संस्कृती, यांचाही विचार ते सारखा करीत. वास्तुरचनाशास्त्र हा विषय केवळ आर्किटेक्टचाच विषय राहता कामा नये; तर तो सामान्य माणसाचाही व्हायला हवा, असे ते सातत्याने सांगत. त्यासाठी त्यांनी डझनभर पुस्तकं लिहिली! त्यासाठी स्वतःच रेखाचित्रे काढली. त्यांच्या वयाच्या ऐंशीव्या वर्षी त्यांची दोन पुस्तके वाचकांच्या समोर आली. **'सेंटर फॉर डेव्हलपमेंट स्टडीज'** आणि **'कॉफी हाऊस'** ही त्रिवेंद्रममधील दोन्ही ठिकाणं त्यांच्या दृष्टीची, कामाची साक्ष देणारी आहेत. केरळमधील कुठलीही इमारत नारळाच्या झाडापेक्षा उंच नको असं ते म्हणायचे! मनाने अत्यंत हळव्या असणाऱ्या बेकरांना सुदैवाने तीव्र विनोदबुद्धी असल्याने कठीण प्रसंगातही ते सहजगत्या मार्ग काढीत असत.

बेकर यांनी गुजरातमध्ये किंवा उत्तर प्रदेशमध्ये किंवा पश्चिम बंगालमध्ये बांधलेली घरं व पद्धती निरनिराळ्या प्रकारची आहेत. त्यांनी केरळमध्ये बांधलेल्या घरांपेक्षाही ती निरनिराळी आहेत. म्हणजे केरळमधील बेकर शैली आणि गुजरातमधील बेकर शैली वेगवेगळी ''बेकरशैली'' आहे !



साध्या, गरीब अशा खेडुतांनी बांधलेली घरं मी पाहिली. मला अपरिचित असणाऱ्या साहित्याने आणि साध्या साधनांचा वापर करून बनविलेली ती सुंदर घरं मी पाहात असे. मातीचा चिखल, बांबू आणि साध्या दर्जाचं वाळलेलं गवत एकत्र करून त्यांनी बांधलेली व टिकाऊ घरं माझ्या मनाला मोहून टाकीत !

**– लॉरी**








सौर उर्जेवर चालणारी बैलगाडी
(बेकर यांनी काढलेलं व्यंग्यचित्र)

बेकर यांच्या कामाच्या पद्धतीवर आणि दृष्टीकोनावर अनेक लोक प्रतिकूल टीका करीत असत. परंतु बेकर या आरोपांना उत्तरे देण्यात आपला वेळ वाया घालवीत नसत. त्यांचा तो स्वभावही नव्हता. सामान्य माणसाला सुंदर आणि टिकाऊ घरं बांधून देण्याची त्यांची वृत्ती, त्यांना अशा वेळेस साहाय्यभूत ठरत असे. काही प्रसंगी मात्र सार्वजनिक जीवनातील वाईट अवस्था, त्यांना लेख लिहिण्यास प्रवृत्त करीत असे. त्या लेखात निषेध व्यक्त करण्याबरोबरच ते नवनवीन पर्यायही सुचवीत.

लॉरी हे नुसते आर्किटेक्ट नव्हते. जीवनाच्या अनेक अंगांना, क्षेत्रांना स्पर्श करणारी त्यांची बुद्धी होती. भूलतज्ज्ञ, माळी, स्वैपाकी, शेतकरी, कामगार, ड्रायव्हर, सुतार, गवंडी, कवी आणि व्यंग्यचित्रकार म्हणूनही बेकर विशेष होते. लॉरी बेकर यांनी काढलेली व्यंग्यचित्रे, ही त्यांच्यातील विनोदबुद्धी दाखवितात आणि कठीण प्रसंगी आपण साधेपणाने जीवनाकडे कसे बघू शकतो, याचेही उत्तम उदाहरण देतात. काम अंतःकरणपूर्वक आणि निष्ठेने, तसंच रसिकतेनं करणाऱ्या बेकरांना जीवन जगण्यात खूप रस होता. त्यांचं जगणं हाच त्यांचा संदेश होता व आहे त्यांना भारतीय नागरिकत्व 1988 ला मिळालं; पण वस्तुतः त्यांचा गांधींजींशी संबंध आला, त्याच क्षणाला ते भारतीय झाले होते !

ब्रिटिश सरकारने त्यांना 'ऑर्डर ऑफ ब्रिटिश एम्पायर' असा बहुमान दिला. युनायटेड नेशन्सने त्यांना नोबेल पुरस्काराच्या तोडीचा 'हॅबिटॅट' पुरस्कार दिला. भारत सरकारने 1990 मध्ये त्यांना पद्मश्री पुरस्काराने सन्मानित केले! टिळक हा मुलगा आणि विद्या व हायडी या दोन मुली असणारे लॉरी बेकर, भारतावर आणि भारतीयांवर फार प्रेम करीत.

विलक्षण विनोदबुद्धी असणाऱ्या लॉरी बेकर यांचं निधन, 1 एप्रिल 2007, म्हणजे एप्रिलफूल च्याच दिवशी, त्यांच्या वयाच्या नव्वदाव्या वर्षी त्यांच्या 'हॅम्लेट' या नावाच्या घरी झालं.



तुम्हाला अर्धी वीट हवी आहे ना ?



मग संपूर्ण वीट
तोडण्यात, वीट,
पैसे, वेळ आणि ऊर्जा
कशासाठी खर्च करता ?



जरा खाली वाका
आणि वाया गेलेली, अर्धी तुटलेली वीट उचला आणि वापरा.












हे घर देखील चिखल आणि विटांपासूनच
बनवले आहे. त्याला मजलेही आहेत
आणि नारळाच्या उंच झाडाचे छप्पर देखील.



चिखल आणि विटांपासून हे घर बनवले आहे.
सुंदर आहे ना ?

या देशात वीस कोटी लोकांना राहायला घरं नाहीत. आर्किटेक्चर क्षेत्रातील लोकांनी याचा विचार करावा. साध्या साहित्याने, टिकाऊ व सुंदर घरं होतील, असं त्यांनी पाहायला हवं. लोकांची ही मूलभूत गरज आहे. त्याची पूर्तता होणं शक्य आहे. गरज आहे आपल्या दृष्टीकोनातील बदलाची. पाणी, सांडपाण्याचा निचरा करणारी व्यवस्था उत्पन्न करणे, अत्यंत आवश्यक आहे. खूप मोठा समाज जगण्यासाठीच्या मूलभूत सुविधांपासून वंचित आहे, हे लक्षात घेतलं की, आपण वेगळा विचार करू. मग होणारी कृती ही आत्ताच्या कृतीपेक्षा वेगळी असेल !

घरं बांधताना आपण विटांचा वापर करतो आणि त्यांना प्लास्टर करून पुन्हा विटांचा रंग देतो आणि ती भिंत पुन्हा फक्त विटांचीच आहे, असा भास उत्पन्न करतो; हे किती वेडगळपणाचे आहे! एखाद्या चित्रकाराचं एखादं चित्र आपल्याला आवडलं, की आपण ते घरी आणतो आणि भिंतीवर लावतो किंवा एखाद्या शिल्पकारानं बनवलेलं शिल्पही आपल्या घरी आपण योग्य जागी ठेवतो. पण ते पाहू इच्छिणाऱ्या व्यक्तीला तिथं आवर्जून जावं लागतं. तसं घरांचं, इमारतीचं नाही. त्या जाता-येता आपल्याला दिसतात. पर्यायच नसतो आपला त्या पाहण्यावाचून. गत्यंतरच नसते आपले अशा परिस्थितीत. आर्किटेक्टचं हे काम आहे की, ती इमारत पाहणाऱ्याला आनंद मिळेल, वेगळं घर दिसल्याचं सुख देईल !

# लॉरी बेकर



■ भारतीय लोकांच्या घरांना, अनेक ठिकाणी जाळी असल्याचं मी पाहिलं आणि त्याचा माझ्या घरबांधणी रचनांमध्ये मी खूपदा वापर केलाय. त्यामुळे घराला सुंदरता येते आणि तसं करणं आर्थिकदृष्ट्या परवडतं देखील. तेथील हवामानाला, वातावरणाला ते मिळतं जुळतंही आहे. अपवाद फक्त उन्हाळ्यातील तीव्र झळांचा जिथं त्रास होतो, तिथला. नैसर्गिक व आपल्याला आवश्यक तितका प्रकाश आणि हवा आपल्याला सहजी उपलब्ध होते. दरवाज्यांवर आणि खिडक्यांवर सपाट लिंटेल्सचा वापर करण्याऐवजी, अर्धवर्तुळाकृती कमानींचा वापर करणं स्वस्त आणि सुंदर आहे. विशेष म्हणजे ते अधिक टिकाऊ आहे ! दारांच्या आणि खिडक्यांच्या चौकटीही अनावश्यक आहेत, असं माझं म्हणणं आहे आणि माझ्या अनेक घरांमध्ये हा प्रयोग मी यशस्वीरित्या करुन दाखविला आहे.

■ अत्यावश्यक असणाऱ्या सोयी सुविधा नाहीत, अशी लक्षावधी घरं भारतात आहेत. जमिनी, भिंती, छपरं, दरवाजे, खिडक्या असं महत्त्वाचंच नीट नाहीये. दोन-दोन कुटुंब त्याच लहान घरात राहतात! कसा अभ्यास शांततेत करतील तिथली मुलं? आपण खूप मोठ्या, उंच, गगनचुंबी इमारती बांधतो, मॉल बांधतो, वातानुकुलित थिएटर्स बांधतो, नद्यांवर मोठेच्या मोठे पूल बांधतो, आणि प्राथमिक व मूलभूत गरज असणारी लक्षावधी कुटुंबांची घरं मात्र अशी आहेत, ज्यात राहणं त्यांना अशक्य असतं. त्या घरात राहणाऱ्या लोकांचा जीवनविषयक चांगला दृष्टीकोण विकसित होणं, असंभव वाटतं मला ! आपल्या जगण्याचा आपल्या घराशी आणि परिसराशी फार जवळचा संबंध असतो.



माझ्या काही हिंदू आणि इस्लाम धर्मीय मित्रांच्या वर्णनावरुन मला असं वाटलं की, हे लोक खरे ख्रिश्चन आहेत. माझ्यापेक्षा अधिक उदार ख्रिश्चन आहेत! माझ्या ऐंशी वर्षांच्या जीवनावरून माझं असं मत झालंय की, हिंसा ही सर्वात वाईट बाब आहे. धर्म, वंश, देश या व अशा प्रकारच्या कोणत्याही मुद्दयाला धरून केलेली हिंसा ही, माणसाचे मूलभूत प्रश्न सोडवू शकत नाही. एकमेकांबद्दलची माणुसकी व प्रेमाची भावनाच माणसांचे प्रश्न सोडवेल आणि हाच खरा धर्म आहे !

बांधकामाच्या रचनाचित्रांबाबत बेकर अगदी अल्प मानधन घेत. एखाद्या गवंड्याची रोजची जितकी हजेरी असे त्या प्रमाणात त्यांचं मानधन असायचं ! म्हणायचे "एका वेळी दोन-तीन बांधकामं चालू असतात, त्यामुळे एवढा पैसा पुरतो मला !! आणि आमच्या बांधवांनी तुमच्या देशाला अगोदरच ओरबाडून घेतलं आहे, लुटलंच आहे. त्याची भरपाई करणं कठीण आहे. खरंतर मी काहीच घ्यायला नकोय, पण माझ्यातही थोडा स्वार्थ आहेच !!"

जागेचा उंच सखलपणा आणि जागेच्या भोवतालच्या भागाचा खूप विचार मी करतो. तिथं कुठली छोटी झाडं आहेत, कुठले वृक्ष याचाही अभ्यास करतो मी. गुरं ठेवायची जागा, पाळीव प्राणी ठेवण्याची सोय, वारा, पाऊस येणाऱ्या दिशा, याबद्दल माझ्या मनात एक सततची जाणीव असते. बांधलेलं घर त्या घराचा मालक वापरणार आहे, मी नाही हे पक्कं ध्यानात ठेवून त्यासंदर्भात माझं चिंतन सतत चाललेलं असतं.





भारत सरकारने
1990 मध्ये
लॉरी बेकर यांना
पद्मश्री पुरस्काराने
सन्मानित केले!




6 Every building should be <u>UNIQUE</u>. No two people, or families etc are alike, so why should their houses all be the same?

10 <u>DONT ROB NATIONAL RESOURCES</u> & do not use them ~~extravagantly~~ or ~~unnecessarily~~.

11 Be <u>HONEST & TRUTHFUL</u> in design & material usage, construction, costs, & about your own mistakes!

12 <u>AVOID OPULANCE & 'SHOWING-OFF'</u>, and dont use currently fashionable gimmicks.

13 Get your <u>CONSCIENCE</u> out of deep-freeze & USE it. Let <u>ALL YOU DO</u> be honest & Truthful - not only yr buildings.

14 Look closely at <u>YOUR OWN PREJUDICES.</u> Question them and see if they are still justifiable!

15 <u>HAVE FAITH IN YOUR OWN CONVICTIONS</u> & have Courage to stick to them — but respect those of other people.

16 Make <u>COST-EFFICIENCY your WAY OF LIFE</u> - not merely "Low Cost for the Poor". Practice what you preach.

20 TRIM your drawings, staff, equipment, travel & transport, paper, & expenses.

(MY FEELINGS ABOUT BEING AN ARCHITECT!) <u>Laurie Baker</u>

